ग्रामविकास भवन, खारघर याची देखभाल दुरुस्ती व नवीन मिळालेल्या ग्रामविकास भूखंडाचे नियोजनाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः उमेद- २०२१/प्र.क्र.१४१/योजना-३
२५, बांधकाम भवन, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
**दिनांक: - २२ ऑक्टोबर, २०२१**

**शासन निर्णय :-**

१. ग्रामविकास भवन, खारघर याची देखभाल दुरुस्ती व नवीन मिळालेल्या ग्रामविकास भूखंडाचे नियोजनाबाबत मा. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांच्या अध्यक्षतेखाली ग्रामविकास भवन, खारघर, नवी मुंबई येथे शनिवार दिनांक २५.०९.२०२१ रोजी सकाळी ११.०० वा. बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत ग्रामविकास भवनाचे Registration कसे करावे, त्याच्यामार्फत अधिकाधिक उत्पन्न कसे मिळवावे, ग्रामविकास भवन SIRD कडे हस्तांतरण करावे याबाबत अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान | - | अध्यक्ष |
| २) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामिण गृहनिर्माण, बेलापूर, नवी मुंबई | - | सदस्य |
| ३) संचालक, SIRD, यशदा, पुणे | - | सदस्य |
| ४) संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज्य अभियान, पुणे | - | सदस्य |
| ५) डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी, उपमहासंचालक, यशदा,पुणे | - | निमंत्रित |

२. **सदर**समितीने खालील मुद्यांचा अभ्यास करून आपला अहवाल १५ दिवसांच्या आत मा. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांना सादर करावा.

१. ग्रामविकास भवनाची नोंदणी करणे

२. ग्रामविकास भवनापासून अधिकाधिक उत्पन्न कसे मिळवता येईल याबाबत शिफारशी करणे.

३. ग्रामविकास भवनाचे RGSA कडे हस्तांतरण करणे. तसेच त्याठिकाणी SIRD चे Subcentre सुरू करून त्याचे रूपांतर Regional Training Center म्हणून करण्यासाठी शिफारशी करणे.

४. ग्रामविकास भवनाशेजारील भूखंड क्र. ७६ ब चे नियोजन करणे.

५. ग्रामविकास भवन येथील दुकानांच्या गाळ्यांपासून अधिकाधिक उत्पन्न कसे मिळवता येईल यासाठी शिफारशी करणे.

६. ग्रामविकास भवनाचे प्रभावी मार्केटींग करण्यासाठी शिफारशी करणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२११०२२१३२५५५७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: cn=Dilip Babasaheb Patil, o=Rural Development Department, ou, email=dilip.patil@nic.in, c=US
Date: 2021.10.22 14:22:09 +05'30'

**(दि. बा. पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मंत्री, ग्राम विकास विभाग यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री, ग्राम विकास विभाग यांचे खाजगी सचिव
३) अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक.
४)सह सचिव (केंद्रीय योजना), मंत्रालय, मुंबई-३२.
५)मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामिण जिवनोन्नती अभियान , नवी मुंबई
६) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामिण गृहनिर्माण, बेलापूर, नवी मुंबइ
७) संचालक, SIRD, यशदा, पुणे
८) संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज्य अभियान, पुणे
९) डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी, उपमहासंचालक, यशदा,पुणे
१०) निवड नस्ती, योजना-३.